थकीत प्रकरणांचा मासिक अहवाल नियमितपणे
सामान्य प्रशासन विभाग (र.व का.) यांचेकडे
पाठविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक : थकीप्र-१०१०/प्र.क्र.७२/१८ (र.व का.),
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २४ नोव्हेंबर २०१०.

**परिपत्रक**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार फाईलींचा निपटारा विहित कालमर्यादेत करणे बंधनकारक आहे. यामध्ये कसुरी केल्यास उक्त अधिनियमातील कलम १० (१) व (२) मधील तरतुदींनुसार संबंधितांविरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्याची तरतूद केलेली आहे.

२. सामान्य प्रशासन विभाग (रचना व कार्ये ) यांच्याकडे प्रत्येक महिन्यात प्रत्येक मंत्रालयीन प्रशासकीय विभागाने निकाली काढलेल्या प्रकरणांचा अहवाल ७ तारखेपर्यंत पाठविण्याबाबतच्या सूचना वेळोवेळी निर्गमित केलेल्या आहेत. तथापि सदर अहवाल ही तारीख उलटून गेल्यावर विलंबाने पाठविले जातात असे सातत्याने निदर्शनास येत आहे. यामुळे विभागाच्या कामाचा आढावा घेणे शक्य होत नाही. याबाबत मा.मुख्य सचिव यांनी तीव्र नाराजी व्यक्त केली आहे.

३. उपरोक्त परिस्थितीत मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभागांना असे निर्देश करण्यात येत आहेत की, प्रत्येक मंत्रालय विभागांनी मागील महिन्यात निकाली काढलेल्या प्रकरणाची माहिती विहीत विवरणपत्रात प्रत्येक माहिन्याच्या ७ तारखेपर्यंत सामान्य प्रशासन विभाग (का.१८/र.व का.) यांच्याकडे पाठविण्याची दक्षता घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashatara.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक 201011241457470001 आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(नंदकुमार जंत्रे)
सचिव (प्र.सु.र.व का.)

प्रति,
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग ,

प्रत,
मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.